**शासन सेवेतील गट अ,गट ब व गट क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्रधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यासाठी दिलेली स्थगिती उठविणे बाबत....**

## महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एसआरव्ही २०१४/प्र.क्र.२६/कार्या.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई

तारीख: १९ जानेवारी, २०१५

**वाचा -**

१) **मा.सर्वोच्च न्यायालयाने रिट पिटीशन (सिव्हील) क्र.८२/२०११ मध्ये दिनांक ३१.१०.२०१३ रोजी दिलेला निर्णय**

२) **महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.**

३) **शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-१०१४/प्र.क्र.२६ /१२ दि. ३१.०१.२०१४**

४) **शासन निर्णय क्रमांक-एसआरव्ही-१०१४/प्र.क्र.२६ /१२ दि. २०.०५.२०१४**

५) **शासन परिपत्रक क्रमांक -एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/का.१२ दि.२६.११.२०१४**

६) **शासन परिपत्रक क्रमांक -एसआरव्ही-२०१४/व्हीआयपी २८४/प्र.क्र.३६२/का.१२ दि.०९.१२.२०१४**

## शासन निर्णय -

२. राज्य शासन सेवेतील गट-अ, गट-ब व गट-क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पदस्थापना, बदली याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबतचे आदेश संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक ३१.०१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये दिले होते. तद्‌नंतर सदर शासन निर्णयास पुढील आदेश होईपर्यंत संदर्भ क्रमांक २ - दिनांक २०.०५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये स्थगिती दिली होती.

यासंदर्भात शासन खालीलप्रमाणे निदेश देत आहे :-

१) शासन निर्णय दिनांक २०.०५.२०१४ अन्वये या प्रकरणी दिलेली स्थगिती उठविण्यात येत आहे.

२) प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील गट अ व गट ब (राजपत्रित) मधील संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापना व बदल्या याबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करणे आवश्यक आहे. तथापि अत्यंत आवश्यक असल्यास यामध्ये बदल करण्याचा अधिकार शासनास राहील.

३) शासकीय अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार दुय्यम अधिकाऱ्यांना प्रत्यार्पित करण्याच्या संदर्भात शासन परिपत्रक दिनांक २६.११.२०१४ व दिनांक ०९.१२.२०१४ च्या परिपत्रकान्वये सूचना दिलेल्या आहेत. त्याप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्याने आपले अधिकार दुय्यम प्राधिकाऱ्यास प्रत्यार्पित केले असल्यास त्या पातळीवरील सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारस करण्यासाठी नागरी सेवा मंडळ कार्यरत राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११९१४५५०८२८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagwan Sahai

Digitally signed by Bhagwan Sahai
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Sahai
Date: 2015.01.19 15:57:38 +05'30'

**( डॉ. भगवान सहाय )**
अपर मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानभवन, मुंबई,
५. राज्यातील सर्व संसद सदस्य,
६. राज्यातील सर्व विधानमंडळ सदस्य,
७. मुख्य सचिव,
८. सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
९. सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),त्यांनी हे आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावे.
१०. *प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
११. *प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
१२. *प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
१३. * सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१४. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानसभा) मुंबई,
१५. *सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधान परिषद) मुंबई,
१६. *राज्य निवडणूक आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,
१७. *सचिव, राज्य माहिती आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई,

१८. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई,
१९. *महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई,
२०. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर,
२१. *महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर,
२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मुंबई (प्रसिध्दीकरिता ५ प्रती)
२३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधान भवन, मुंबई ४०० ०३२ (१० प्रती)
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
२६. मुख्य लेखापरीक्षक (निवासी लेखे), कोंकण भवन, नवी मुंबई,
२७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधान भवन, मुंबई ३२ (१० प्रती)
२८. सर्व विभागीय आयुक्त,
२९. सर्व जिल्हाधिकारी,
३०. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
३१. बहुजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई १ (५ प्रती)
३२. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरॅक नं.१ योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई २० (५ प्रती)
३३. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस. व्ही.पटेल रोड, मुंबई ४ (५ प्रती)
३४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई १३ (५ प्रती)
३५. इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई २५ (५ प्रती)
३६. नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, , नरीमन पॉईंट, मुंबई २१ (५ प्रती)
३७. शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई २८ (५ प्रती)
३८. सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख,
३९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
४०. निवड नस्ती.